**बंदरापर्यंत रोड/रेल्वे मार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर (पश्चजल) विकास (३०५१ ०७६८) या योजनेसाठी सन २०१९-२० मध्ये अर्थसंकल्पीत निधीपैकी रू.१०.८० कोटी इतका निधी खर्च करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी १०१९/प्र.क्र.६०/बंदरे-२**
**गृह विभाग, मंत्रालय**
**मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२०**

**संदर्भ:-** १. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/मुकाअ/अभि/निधी वितरण प्रस्ताव/२०१९-२०/ ५९३४, दि.२२.१०.२०१९,

२. महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाचे पत्र क्र.ममेबो/मुकाअ/अभि/निधी वितरण प्रस्ताव/२०१९-२० दि.९.१२.२०१९

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून राबविण्यात येणाऱ्या “बंदरापर्यंत रोड/रेल्वे मार्ग बांधणे आणि ब्रेकवॉटर (पश्चजल) विकास” या योजनेकरीता सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु.१८.०० कोटी इतक्या रकमेपैकी ६० टक्केच्या मर्यादेत रु.१०.८० कोटी (रुपये दहा कोटी ऐंशी लक्ष) इतका निधी **सोबतच्या परिशिष्टात** नमुद कामांवर खर्च करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांना मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या दि.८.०७.२०२० व दि.२२.०१.२०२० च्या परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी तसेच यापूर्वीचा शिल्लक निधी ३१.०३.२०२० पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगीता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावे.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च “मागणी क्र. बी-७, लेखाशीर्ष क्र. ३०५१- बंदरे व दिपगृहे, (८०) सर्वसाधारण, (१९०), सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (०१) सागरी मंडळास (मेरीटाईम

बोर्डास) सहायक अनुदान, (०१)(०८) बंदरापर्यंत रस्ते/रेल्वे मार्ग बांधणे आणि बॅकवॉटर (पश्चजल) विकास (योजनांतर्गत) (३०५१ ०७६८)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

७. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या दि.०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील १ ते १० अटींची पूर्तता होत असल्याची खात्री करण्यात आली आहे. यापूर्वी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास अदा करण्यात आलेला रू.६.५८ कोटी निधी १०० टक्केच्या मर्यादेत खर्च केल्याचे उपयोगीता प्रमाणपत्र संदर्भाधीन दि.०९.१२.२०१९ च्या पत्रान्वये महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने सादर केलेले आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये विभागागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००२१८१५५९४११९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Bhikan Onkar Thakur
Date: 2020.02.18 16:02:27 +05'30'

**(भि.ओ.ठाकूर)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
२) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
३) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
४) प्रधान सचिव (बंदरे), गृह विभाग.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
९) निवडनस्ती (बंदरे-२)

**शासन निर्णय क्रमांकः बीजीटी १०१९/प्र.क्र.६०/बंदरे-२, दि.१५ फेब्रुवारी, २०२० सोबतचे परिशिष्ट**

| **अ.क्र.** | **कामाचे नाव** | **अंदाजपत्रकिय किंमत** | **सन २०१८-१९ करीता आवश्यक निधी** |
|---|---|---|---|
| १ | रेवस, ता.अलिबाग, जि.रायगड येथे जेट्टी पर्यंत जाणाऱ्या रस्त्याचे मजबुतीकरण करणे | ४.९४ कोटी | ३.०० कोटी |
| २ | फरारे रो-रो जेट्टी पडवळवाडी पासून उन्हवरे बुध्दवाडी पर्यंत जोडरस्ता तयार करणे | ४.९७ कोटी | ३.०० कोटी |
| ३ | भरडखोल, ता.श्रीवर्धन, जि.रायगड येथे जेट्टी व पोचरस्त्याचे बांधकाम करणे | ४.८७ कोटी | ३.५४ कोटी |
| ४ | मिऱ्या जंक्शन ते भगवती बंदर जेट्टी ता.जि.रत्नागिरी येथील रस्ता दुरूस्ती करणे | ९.९६ कोटी | १.२६ कोटी |
| **एकुण** | | **२४.७४ कोटी** | **१०.८० कोटी** |

Digitally signed by Bhikan Onkar Thakur
Date: 2020.02.18 16:02:43 +05'30'

**(भि.ओ.ठाकूर)**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**